**श्री. किवळेकर अरविंद वामनराव, प्राध्यापक, संगणक अभि. शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावरील नियुक्ती रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१२/९२/२०१३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक -: २८ जुलै, २०१७

**पहा:-** उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१२/९२/२०१३ दि. १६/४/२०१६

**प्रस्तावना-:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार श्री. किवळेकर अरविंद वामनराव यांची प्राध्यापक, संगणक अभि. शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय जळगाव येथे संदर्भाधिन शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आली होती. सदर नियुक्ती आदेशामध्ये उमेदवाराने सदर पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे असे नमूद करण्यात आले आहे.तथापि श्री. किवळेकर यांनी केलेल्या विनंतीस अनुसरून त्यांना दि. ३१/०८/२०१६ पर्यंत रुजु होण्यास मुदतवाढ देण्यात आलेली होती. त्यानुसार श्री. किवळेकर यांनी दि. ३१/०८/२०१६ पर्यंत रुजु होणे आवश्यक होते. तथापि ते सदर पदावर अद्यापपर्यंत रुजु झाले नाहीत. त्यामुळे श्री. किवळेकर यांना उपरोक्त पदावर शासन सेवेत कार्य करण्यासाठी स्वारस्य नसल्याचे दिसून येते. या विलंबामुळे महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान टाळण्यासाठी आवश्यक ती पुढील कार्यवाही करण्यास शासनास सोयीस्कर व्हावे याकरीता श्री. किवळेकर यांची नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार श्री. किवळेकर अरविंद वामनराव यांची प्राध्यापक, संगणक अभि. शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय जळगाव येथे संदर्भाधिन शासन निर्णयान्वये करण्यात आलेली नियुक्ती या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२८१७२४०६६७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.07.28 17:29:36 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन आधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. किवळेकर अरविंद वामनराव, लक्ष्मी नृसिंह निवास, टेंभे वाड्याजवळ, निजामपूर रोड,माणगाव जि. रायगड.

**प्रत,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
५. प्र. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, नाशिक.
६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव.
९. निवड नस्ती (तांशि-१).